**तालुका, जिल्हा आणि राज्यस्तरावरील बैठकांमध्ये वृक्ष लागवड आणि संगोपन हा मुद्दा स्थायी विषय म्हणून बैठकांच्या विषयसूचीमध्ये आणि क्षेत्रीय स्तरावरील निरिक्षण भेटीमध्ये अंतर्भूत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१६२/समन्वय कक्ष**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २२ डिसेंबर, २०१७

वाचा:- **१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक-साववि-२०१६/ प्र.क्र.१३१/फ-११, दि.३१.०३.२०१६.**

**२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक-साववि-२०१६/ प्र.क्र.८०/फ-११, दि.१०.१०.२०१६.**

**३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक-साववि-२०१६/ प्र.क्र.१६६/फ-११, दि.०४.०१.२०१६.**

प्रस्तावना:-

हवामान आणि ऋतूबदल, वाढते तापमान, दुष्काळ आणि पाण्याचे दुर्भिक्ष या नैसर्गिक आपत्तींची दाहकता आणि तीव्रता कमी करण्यासाठी **"हरित महाराष्ट्र"** ही संकल्पना राबविण्यासाठी महत्वपूर्ण निर्णय शासनाने घेतला आहे. या कार्यक्रमांतर्गत सन २०१७ ते २०१९ या कालावधीत ५० कोटी वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट ठरविण्यात आले असून, सन २०१७ मध्ये ४ कोटी वृक्षारोपन कार्यक्रमाची अंमलबजावणी झाली आहे.त्याशिवाय सन २०१६ मध्ये दि.१ जुलै, २०१६ या एकाच दिवशी २ कोटी वृक्ष लागवडीचा आगळा वेगळा व महत्वाकांक्षी कार्यक्रम कार्यान्वित करण्यात आला.

२. सन २०१८ आणि सन २०१९ मध्ये अनुक्रमे १३ कोटी आणि ३३ कोटी वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट आहे. वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट पूर्णपणे साध्य व्हावे आणि त्याचबरोबर आतापर्यंत लागवड केलेल्या झाडांचे संरक्षण, देखभाल आणि संगोपन उत्तमरितीने होणे हे अत्यंत गरजेचे आहे.

३. दि.१ जुलै ते ७ जुलै, २०१७ या कालावधीमध्ये ४ कोटी वृक्षारोपन कार्यक्रमाचे सादरीकरण मा. मंत्रीमंडळासमोर दि.१३ जुन, २०१७ रोजी करण्यात आले. त्यावेळी झालेल्या चर्चेनुसार यासंदर्भात करावयाच्या कार्यवाहीबाबत मा. मंत्री मंडळाने दिलेल्या सहमतीनूसार सूचना क्षेत्रीय कार्यालयांना कळविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्यानूसार या परिपत्रकाद्वारे त्याअनुषंगाने सूचना निर्गमित करण्यात येत आहे.

परिपत्रक:-

शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत क्षेत्रीय स्तरावरील तालुका, जिल्हा आणि राज्यस्तरीय बैठकांमध्ये वृक्ष लागवड आणि संगोपन या संदर्भातील विषय प्रत्येक बैठकांच्या वेळी विषयसूचीमध्ये स्थायी विषय म्हणून अंतर्भूत करण्यात यावा. अशा बैठकांमध्ये वृक्ष लागवडीचा आढावा, या पूर्वी लावलेल्या झाडांचे जिवंत राहण्याचे प्रमाण, मृत झाडांच्या जागी नवीन झाडांची लागवड, पुढील वर्षामध्ये वृक्ष लागवडीच्या

उद्दिष्टाप्रमाणे वृक्षारोपनासाठी स्थळ निश्चिती, रोपांची उपलब्धता, आवश्यक त्या तांत्रिक परिमाणाप्रमाणे विहित कालावधीमध्ये पीट्स तयार करणे, निधीची उपलब्धता इत्यादी संदर्भात पूर्वतयारी बाबत आढावा घेण्यात यावा.

२. अशा बैठकांमध्ये वृक्षलागवड कार्यक्रमासंदर्भात झालेल्या निर्णयाची नोंद बैठकीच्या इतिवृत्तामध्ये करण्यात यावी. तसेच इतिवृत्तामध्ये नमुद केलेल्या निर्णयासंदर्भात झालेल्या अमंलबजावणीबाबत आणि येणाऱ्या अडचणीसंदर्भात पुढील बैठकीमध्ये चर्चा होऊन क्षेत्रीय अधिकाऱ्यांना येणाऱ्या समस्या आणि अडचणी सोडविण्यासाठी उपाययोजना करण्यात याव्यात.

३. तालुका, जिल्हा आणि राज्य स्तरावरील जे अधिकारी क्षेत्रीय कामांना भेटी देतील, त्यावेळी त्या त्या विभागाअंतर्गत वृक्ष लागवडीच्या स्थळांना आवर्जून भेटी देण्याचा कार्यक्रम आयोजित करण्यात यावा. अशा क्षेत्रीय भेटीच्या वेळी संबंधित प्रशासकीय विभागांतर्गत लावलेल्या झाडांचे संरक्षण योग्यरितीने होते किंवा नाही, मृत झाडांच्या बदल्यात नवीन झाडे लावली गेली किंवा नाही, पाण्याची व्यवस्था आणि संरक्षणासाठी मनुष्यबळ इत्यादी बाबींची वरिष्ठ अधिकाऱ्यांनी पाहणी करावी. त्याचप्रमाणे येणाऱ्या अडचणी सोडविण्याबाबत उपाययोजना कराव्यात.

४. प्रस्तावित वृक्ष लागवडीसाठी निवडलेली स्थळे आवश्यक त्या परिमाणाचे पीट्स विहित वेळेत तयार करणे आणि अशा स्थळावर लावण्यात येणाऱ्या झाडासाठी पाण्याची आणि संरक्षण व्यवस्था, वृक्ष लागवडीसाठी निधीची व्यवस्था याबाबत देखील पाहणी करून क्षेत्रीय अधिकाऱ्यांना आवश्यक ते मार्गदशन द्यावे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक क्र. २०१८०६२७१७१४२७८०२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2018.06.27 17:19:52 +05'30'

**( र.प्र.आटे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतः-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. आयुक्त (क्रीडा व युवकसेवा संचालनालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परिक्षा परिषद, पुणे.

६. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.

७. संचालक, अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण संचालनानय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे.

९. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

१०. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक

११. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक)

१२. सर्व शिक्षण निरीक्षक (पश्चिम/उत्तर/दक्षिण), बृहन्मुंबई.

१३. निवडनस्ती (समन्वय कक्ष).